नक्षलग्रस्त भागाच्या विकासाचा “विशेष कृती कार्यक्रम” अंतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षासाठी गडचिरोली, गोंदिया, चंद्रपूर व भंडारा जिल्ह्यांकरीता निधी वितरित करणेबाबत....

# महाराष्ट्र शासन
## नियोजन विभाग
**शासन निर्णय क्रमांक : नक्षल-२४१९/प्र.क्र.७९/का-१४१७**

मंत्रालय, मुंबई-३२.

दिनांक : २ नोव्हेंबर, २०२०

<u>वाचा :</u> १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.नविका-१००९/प्र.क्र.६८/का-१४१५ दिनांक १७.१२.२००९ व दिनांक २७.१.२०१०

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६.४.२०२०

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक ४.५.२०२०

**प्रस्तावना :**

नियोजन विभागाच्या दिनांक १७.१२.२००९ व दिनांक २७.१.२०१० रोजीच्या शासन निर्णयांन्वये गडचिरोली, गोंदिया, चंद्रपूर व भंडारा जिल्ह्यांकरीता समन्वय समितीला नक्षलग्रस्त भागातील स्थानिक पातळीवरील समस्यांचे तातडीने निराकरण करण्यासाठी विशेष कृती कार्यक्रमांतर्गत प्रत्येक आर्थिक वर्षात रुपये ३.०० कोटी प्रमाणे निधी नियोजन विभागामार्फत उपलब्ध करून देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. तथापि, सध्या कोविड या साथरोगामुळे सन २०२०-२१ या वित्तिय वर्षात होणाऱ्या राज्याच्या अर्थव्यवस्थेवरील परिणामांबाबत वित्तीय उपाययोजना करण्याबाबत वित्त विभागाने दि.१६.४.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये व दि.४.५.२०२० रोजीच्या परिपत्रकान्वये वितरीत निधी खर्च करण्याबाबत सूचना निर्गमित केल्या आहेत. त्यानुसार वित्त विभागाच्या सहमतीस अनुसरुन जिल्हाधिकारी गडचिरोली, गोंदिया, चंद्रपूर व भंडारा यांना सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासननिर्णय :**

नक्षलग्रस्त भागातील स्थानिक पातळीवरील समस्यांचे निराकरण करण्यासाठी चंद्रपूर, गडचिरोली, भंडारा व गोंदिया जिल्ह्यांतील जिल्हाधिकाऱ्यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन करण्यात आलेल्या संबंधित जिल्हा समन्वय समितीस संदर्भाधीन नियोजन विभागाच्या दिनांक १७.१२.२००९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचनांच्या आधारे सामुहिक लाभाच्या योजना / सुविधा निवडून स्थानिक पातळीवरील समस्यांचे तातडीने निराकरण करणे शक्य होण्याकरिता गडचिरोली, गोंदिया, चंद्रपूर व भंडारा या जिल्ह्यांना सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता पुढील प्रमाणे निधी या शासन निर्णयान्वये उपलब्ध करून देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्ह्याचे नाव | गावभेट योजनेसाठी सन२०२०-२१ साठी एकूण तरतूद (रु.लक्ष) | वितरीत निधी (रु.लक्ष) |
|---|---|---|---|
| १ | गडचिरोली | ३००.०० | ७५.०० |
| २ | गोंदिया | ३००.०० | ७५.०० |
| ३ | चंद्रपूर | ३००.०० | ७५.०० |
| ४ | भंडारा | ३००.०० | ७५.०० |
| | **एकूण** | **१२००.००** | **३००.००** |

**२.** नक्षलग्रस्त भागातील स्थानिक पातळीवरील समस्यांचे तातडीने निराकरण करण्यासाठी विशेष कृती कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता उपलब्ध निधी खर्च करताना नियोजन विभागाच्या दिनांक १७.१२.२००९ रोजीच्या संदर्भाधीन शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांचे तसेच वित्त विभागाच्या दिनांक १६.४.२०२० रोजीच्या संदर्भाधीन शासन परिपत्रकातील व वित्त विभागाच्या दिनांक ४.५.२०२० रोजीच्या संदर्भाधीन शासन निर्णयातील सूचनांचे जिल्हा समितीने काटेकोरपणे पालन करावे.

३. नक्षलग्रस्त भागातील स्थानिक पातळीवरील समस्यांचे तातडीने निराकरण करण्यासाठी विशेष कृती कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता उपलब्ध निधी जिल्हाधिकारी गडचिरोली, गोंदिया, चंद्रपूर व भंडारा यांच्या अधिनस्त ठेवण्यात यावा. सदर निधी खर्च करताना त्या निधीपैकी कमीत कमी ७५% निधी नक्षलग्रस्त भागाच्या अती दुर्गम व अती संवेदनशील क्षेत्रामध्ये खर्च करण्यात यावा. यासाठी संदर्भाधीन नियोजन विभागाच्या दिनांक १७.१२.२००९ रोजीच्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या कामाच्या निवडीसाठी परिच्छेद ६, ७ व ८ मधील, योजनंतर्गत हाती घ्यावयाच्या कामांची प्राथमिकता व पूर्ततेबाबत परिच्छेद क्र.९ मधील, अंदाजपत्रक व मंजूरीसाठी परिच्छेद १० मधील आणि निधी वितरणासाठी परिच्छेद १२ व १३ मधील सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

४. नक्षलग्रस्त भागातील स्थानिक पातळीवरील समस्यांचे तातडीने निराकरण करण्यासाठी विशेष कृती कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता उपलब्ध निधी जिल्हाधिकारी गडचिरोली, गोंदिया, चंद्रपूर व भंडारा यांनी खर्च करताना मागणी क्रमांक ओ-७, ३४५१ सचिवालय-आर्थिक सेवा, ०९०, सचिवालय (०१) (०१) नियोजन विभाग, (०४) (०१) नक्षलवादी भागासाठी विशेष कृती दल (योजनांतर्गत) ३१ सहायक अनुदाने वेतनेत्तर (३४५१ ०६५४) या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ या वित्तीय वर्षासाठी उपलब्ध असलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच, या उपशिर्षाखाली होणाऱ्या खर्चासाठी संबंधित जिल्ह्याचे जिल्हाधिकारी हे नियंत्रक अधिकारी असतील व जिल्हा नियोजन अधिकारी हे आहरण व संवितरण अधिकारी असतील. सदर निधीच्या खर्चाचा ताळमेळ ठेवण्याची तसेच, खर्चाची माहिती वेळोवेळी शासनाला देण्याची जबाबदारी “नियंत्रकअधिकारी” म्हणून जिल्हाधिकारी गडचिरोली, गोंदिया, चंद्रपूर व भंडारा यांची राहील.

६. वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक १६ एप्रिल, जुलै २०१९ व ४ मे २०२० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या

अधिकारांस व वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.१८८/२०२०/व्यय-८, दिनांक १५.९.२०२० अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरून सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२०११०२१४४६२९५११६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRADNYA MAHALE

Digitally signed by PRADNYA MAHALE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=31c8683f52ccbefd97bce49983c4151d2caf1c185c657ea855ac85f31e5f681e,
postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=f0b9244e8f45f12e0a399cd036d6d3767c67c8349951e3e5047b7469a24cdfb
2, ou=PLANNING DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRADNYA MAHALE
Date: 2020.11.02 14:48:51 +05'30'

**(प्रज्ञा महाले)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा.उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९. सर्व सन्माननीय विधानसभा सदस्य व विधानपरिषद सदस्य व संसद सदस्य
१०. मा.मंत्री व मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
११. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ व २,मुंबई / नागपूर
१३. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१ व २,मुंबई / नागपूर
१४. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
१५. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली / गोंदिया / चंद्रपूर / भंडारा
१६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद, गडचिरोली / गोंदिया / चंद्रपूर / भंडारा
१७. जिल्हा पोलीस अधिक्षक, गडचिरोली / गोंदिया / चंद्रपूर / भंडारा
१८. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गडचिरोली/ भामरागड, जि.गडचिरोली/अहेरी, जि.गडचिरोली / देवरी, जि.गोंदिया / चिमूर,जि.चंद्रपूर/ चंद्रपूर / भंडारा
१९. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपूर

२०. उप वनसंरक्षक, गडचिरोली / गोंदिया / चंद्रपूर / भंडारा
२१. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली / गोंदिया / चंद्रपूर / भंडारा
२२. जिल्हा नियोजन अधिकारी, गडचिरोली / गोंदिया / चंद्रपूर / भंडारा
२३. कार्यासन अधिकारी, (का-१४११/१४१४/१४२४), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२४. निवडनस्ती (का-१४१७), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२